**प्रशासकीय मान्यता -**

जिल्हा व सत्र न्यायालय, पुणे येथे संरक्षक भिंत, बंकर्स आणि इतर सहाय्यभूत बांधकामे करण्याबाबत

43

**महाराष्ट्र शासन**

विधि व न्याय विभाग,

शासन निर्णय क्र.:-सीसीबी २८०९/१४४/का.१३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :-२५ जून, २०१०.

पहा :- १) प्रबंधक, (निरिक्षण-व्दितीय) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी/डब्ल्यु/६०५४/१९७२, दि.२८ ऑगष्ट,२००९.

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे यांचे पत्र क्र. जन/३६६५/२००९, दिनांक ८.६.२००९.

शासन निर्णय :- जिल्हा व सत्र न्यायालय पुणे येथे संरक्षक भिंतीची उंची वाढविणे, बंकर्सचे बांधकाम करणे व इतर सहाय्यभूत कामाच्या रु.८६,७४,१५१/- (शहाऐंशी लक्ष, चौऱ्याहत्तर हजार, एकशे एकावन्न फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमूद कलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | रक्कम (रुपये ) |
|---|---|---|
| १ | बांधकामाचा अंदाजित खर्च | ८३,४०,५३० |
| २ | आकस्मिक खर्च (४%) | ३,३३,६२१ |
| | एकूण | ८६,७४,१५१ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) "काम सुरू करण्यापुर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी."

ब) " मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुनच काम सुरु करावे."

क) " संरक्षक भिंत, वॉचटॉवर व बंकर्स इत्यादिबाबतची मापे छेद नकाशासह विस्तृत "अंदाजपत्रकात समाविष्ट करूनच काम सुरू करावे."

ड) अंदाजपत्रकात १५.७५ टक्के जास्तीची केलेली तरतूद पाहता ती न्यायालय परिसरात काम करण्याच्या दृष्टीने दरसूची पत्रकानुसार योग्य आहे याची कार्यकारी अभियंता यांनी खातरजमा करुन काम हाती घेण्यात यावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यांत येऊ नये.**

४. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- १६५/इमा-२, दि.३१.५.२०१० अन्वये त्या विभागांच्या सहमतीने आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे,२००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय

अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(र.ग. पांचाळ)
कार्यासन अधिकारी.

प्रति,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय ,मुंबई,
प्रबंधक (निरिक्षण-२) उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे,
अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
कार्यकारी अभियंता, ( सार्वजनिक बांधकाम ) विभाग,पुणे.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम राजभवन उपविभाग, पुणे-७
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग, (व्यय-६) मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई.
कक्ष अधिकारी का.११,१२ विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती .